राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत
रत्नागिरी शहरात भूमिगत विद्युत वाहिनी टाकणे
बाबत............

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)
शासन निर्णय क्र.आव्यप्र- २०१७/प्र.क्र.१६९(भाग-२) (२)/आव्यप्र-१
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दि. २६ फेब्रुवारी, २०२०

**शासन निर्णय :**

जागतिक बँक सहाय्यित राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत रत्नागिरी शहरात भूमिगत विद्यूत वाहिनी टाकण्यासाठी नियुक्त केलेल्या लिना पॉवरटेक इंजिनियर्स प्रा.लि. यांनी जागतिक बँकेच्या मार्गदर्शक सूचनांनूसार बँक हमी (Bank Guarantee) सादर केली आहे. सादर करण्यात आलेल्या बँक हमीस अनुसरुन लिना पॉवरटेक इंजिनियर्स प्रा.लि. यांना करारानूसार १० टक्के अग्रीम रक्कम म्हणून एकूण रु. ८,६५,६९,२९८/- (रुपये आठ कोटी पासष्ट लाख एकोणसत्तर हजार दोनशे अठयान्नव फक्त) एवढा निधी लिना पॉवरटेक इंजिनियर्स प्रा.लि. यांना अदा करण्यास शासन मान्यता येत आहे.

लिना पॉवरटेक इंजिनियर्स प्रा.लि. यांना अदा करावयाच्या रकमेवर २ % आयकर (TDS) आणि २ % जीएसटी टीडीएस वजा करुन त्यांना प्रदान करण्यात यावे.

याबाबतचे देयक अधिदान व लेखाकार्यालय मुंबई यांना सादर करण्याकरिता श्री अर्जून पालव, लेखाधिकारी आपत्ती व्यवस्थापन प्रभाग आणि श्रीमती राजश्री राऊत, वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य ८०, सर्वसाधारण, १०२ आपत्तीप्रवण क्षेत्रामध्ये नैसर्गिक आपत्कालीन परिस्थितीबाबतच्या तातडीच्या योजनांचे व्यवस्थापन करणे (०६) चक्रीवादळ रोधक बांधकाम करणे (०६) (०१) चक्रीवादळ रोधक बांधकाम करणे (७५ टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) ( २२४५ २६०३) या लेखाशिर्षाअंतर्गत आर्थिक वर्ष २०१९-२० या वर्षाकरीता करण्यात आलेल्या तरतुदीतून करण्यात येईल.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५३/व्यय-९/२०१९, दि. २७/०६/२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००२२६१६५८१६३४१९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIRANG SHRIPATI GHOLAP

Digitally signed by SHRIRANG SHRIPATI GHOLAP
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9a2bc3b45be4b89f7c46c4474cf90b8a3c477e34c064494b04238ca50ee43db6, postalCode=400032, street=1ST FLOOR MAIN ROAD, MANTRALAYA, ou=REVENUE AND FOREST DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHRIRANG SHRIPATI GHOLAP
Date: 2020.02.26 17:00:16 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, उर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी लि., प्रकाशगड, वांद्रे, मुंबई.
४) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
५) आव्यप्र-१, संग्रहार्थ